**अ‍ॅड.उज्ज्वल निकम, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत....**
**राहुरी पो.ठा. येथील गु.र.क्र.७५/२०२४ या दाखल गुन्हयातून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणामधील कामकाजाकरीता.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-०२२४/प्र.क्र.३६/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ एप्रिल, २०२५.

**संदर्भ:-**१.विशेष पोलीस महानिरीक्षक (का.व सु.), यांचे पत्र क्र.पोमसं/१४/६६/विसअ-अ‍ॅड.निकम/राहुरी/१२०/२०२४, दि.०२.०४.२०२४.
२.शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-२०२४/यू.ओ.आर.४७/डी-१४, दि.०८.०४.२०२४.

**शासन निर्णय :-**

राहुरी पो.ठा. येथील गु.र.क्र.७५/२०२४ या दाखल गुन्ह्यातून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणी शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी अ‍ॅड.उज्ज्वल निकम यांची विधि व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन क्र.२ येथील शासन अधिसूचनेन्वये "विशेष सरकारी अभियोक्ता" म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी काम पाहण्यासाठी अ‍ॅड.उज्ज्वल निकम यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

मा.सत्र न्यायालय,अहमदनगर येथील कामकाजाकरीता :-

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.१,००,०००/- (अक्षरी रुपये एक लाख फक्त)
ब) विचार विनिमय फी (प्रतितास/तासाचा भाग) -रु.२५,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस हजार फक्त)

उपरोक्त नमूद फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ अ‍ॅड. निकम यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फी चे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा.न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधीक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्रमांक बी-१, २०५५ पोलीस -(००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८)- २८ व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२५०४२३१४५१०२९४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HARESHWAR NAMDEO SAHANE

Digitally signed by HARESHWAR NAMDEO SAHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=c666d6034b5e98c5d1bd37af6d50b3277469ad6a9c55fe42051469194c47c2d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A0C4666E299E972427F9DABEDD7FF52FB5313B50C0D9A59C64EC908916651EC1, cn=HARESHWAR NAMDEO SAHANE
Date: 2025.04.23 15:05:26 +05'30'

**( हरेश्वर सहाणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक,गुन्हे अन्वेषण विभाग, म.रा.पुणे.
३) पोलीस अधीक्षक,गुन्हे अन्वेषण विभाग, नाशिक परिक्षेत्र, नाशिक.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०० ०२०.
५) कोषागार अधिकारी, नाशिक.
६) विधि व न्याय विभाग (कार्या-१४), मंत्रालय, मुंबई.
७) वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
८) ॲड.उज्ज्वल निकम, ४८, बॅरीस्टर निकम चौक,जिल्हा पेठ, जळगाव.
९) निवड नस्ती (पोल-१०).